**श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध, जि.सातारा या संग्रहालयाच्या परिसरातील बगीचा-वार्षिक देखभाल, संवर्धन व परिरक्षण कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०२५/प्र.क्र.२०/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२५

<u>वाचा</u> :- संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे जा.क्र.संग्रह/२०२४/ ३५३७, दिनांक ३१.१२.२०२४ रोजीचे पत्र .

**<u>प्रस्तावना</u> :-**

श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध, जि.सातारा या संग्रहालयाच्या परिसरातील बगीचा - वार्षिक देखभाल संवर्धन व परिरक्षण करण्याच्या खर्चास मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी उपर्निर्दिष्ट पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध, जि.सातारा या संग्रहालयाच्या परिसरातील बगीचा - वार्षिक देखभाल, संवर्धन व परिरक्षण यासाठी येणारा खर्च रु.४,८८,८२५/- (अक्षरी रुपये चार लक्ष अठ्ठ्याऐंशी हजार आठशे पंचवीस मात्र) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) “अ” नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. यासाठी होणारा खर्च मागणी मागणी क्र. झेडडी-२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, (०१) (०२) विविध वस्तू संग्रहालयातील विशिष्ट विभागाची पुनर्रचना व विकास (राज्य) (कार्यक्रम) (२२०५ १३२९) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३१३११२५५४३२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D93170255809446855E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.03.13 11:26:34 +05'30'

( नंदा राऊत )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. उप अभिरक्षक, श्री भवानी चित्रसंग्रहालय व ग्रंथालय, औंध, जि.सातारा.
५. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.जिल्हा कोषाधिकारी, सातारा
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती, सां.का.३.